**महा-ई-सेवा केंद्र**
**कार्यक्षम अंमलबजावणीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय मातंसं/नस्ती०९/प्रक्र ८९ /३९**
सामान्य प्रशासन विभाग,
सातवा मजला, राजमुद्राच्या बाजुला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ जानेवारी, २०१०

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ई-गव्हर्नन्स कृती कार्यक्रमांतर्गत (NeGP) राज्यातील ग्रामीण व शहरी भागातील नागरिकांपर्यंत शासकीय, निम शासकीय व खाजगी सेवा पोहोचविण्यासाठी सुमारे चार गावाकरीता एक या प्रमाणात महा-ई-सेवा केंद्र सुरु करण्यात येत आहेत. महा-ई-सेवा केंद्र योजना राज्यामध्ये दिनांक १ सप्टेंबर २००८ पासून सुरु झाली. ग्रामीण व शहरी भागामध्ये एकूण ११८१८ महा-ई-सेवा केंद्र उभारणीचे काम प्रगतीपथावर आहे. शासन निर्णय क्र.डिआयटी/फाईल-८/सी आर-२८/३९, दिनांक ३ डिसेंबर २००८ नुसार महा-ई-सेवा केंद्राच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर माहिती दिलेली आहे. जिल्हाधिका-यांना महा-ई-सेवा केंद्र योजनेची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी दिलेली आहे. शासन सेवा ऑनलाईनव्दारे देण्याची कार्यवाही प्रगतीपथावर आहे, तोपर्यंत या सेवा महा-ई-सेवा केंद्रामार्फत प्रत्यक्ष (Manually) देणे अनिवार्यआहे.

राज्यातील महा-ई-सेवा केंद्राचे महत्व लक्षात घेता व या केंद्रास मदत होण्याच्या दृष्टीने विभागीयस्तर, जिल्हास्तर, तालुकास्तर या ठिकाणी नोडल अधिकारी नेमणे आवश्यक आहे. या दृष्टीने कार्यपध्दती कशी असावी ही बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासाठी शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

**शासन निर्णय :-**

१. तालुका व जिल्हा स्तरावरील सेतु केंद्रामार्फत देण्यात येणाऱ्या सर्व सेवा महा-ई-सेवा केंद्राच्या माध्यमातूनसुध्दा नागरिकास उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील. या व्यतिरिक्त ग्रामीण, तालुका व जिल्हास्तरावरील देण्यात येणाऱ्या इतर शासकीय विभागांच्या सेवा महा-ई-सेवा केंद्रातुन देण्यात याव्यात. जिल्हाधिकारी यांनी वरील सेवा महा-ई-सेवा केंद्रांना उपलब्ध करुन देणेबाबत त्यांच्या स्तरावर आवश्यक ती कार्यवाही करावी.

२. सेतु केंद्राव्दारे उपलब्ध करुन देण्यात येणारे प्रमाणपत्र यासाठी निश्चित कालमर्यादा ठरविण्यात आलेली आहे. महा-ई-सेवा केंद्रामार्फत प्रमाणपत्र देताना हा कालावधी सेतु सेवा केंद्राच्या कालमर्यादेपेक्षा दोन दिवसांनी अधिक असेल.

३. महा-ई-सेवा केंद्रामार्फत देण्यात येणाऱ्या सेवांची अंमलबजावणी प्रभावीपणे व जलदगतीने होण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी मंडल अधिकाऱ्यास आठवडयातील एक दिवस निश्चित करुन महा-ई-सेवा केंद्रात उपस्थित राहण्याचे आदेश निर्गमित करावेत.

४. महा-ई-सेवा केंद्रातुन शासकीय सेवा पुरविण्यासाठी लागणारे जिल्हास्तरावरील वापरात असलेले सॉफ्टवेअर व Non-editable Databases सर्व्हीस सेंटर एजन्सी ला जिल्हाधिकाऱ्यांनी उपलब्ध करुन देण्यात यावे.

५. जनतेस त्यांच्या रहात्या ठिकाणी कमी श्रमामध्ये व कमी मोबदल्यामध्ये शासकीय सेवा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने संबंधित तलाठी यांना त्यांच्या कार्यक्षेत्रातील महा ई सेवा केंद्रांचे प्रमुख म्हणुन घोषित करणे तसेच जिल्हाधिकारी यांनी निश्चित केलेल्या आठवडयातुन एका दिवशी उपस्थित राहण्याबाबतचे आदेश निर्गमित करावेत. जेणेकरुन ७/१२ उतारा, ८अ चा उतारा फेरफार व इतर महसुल विभागामार्फत पुरविण्यात येणाऱ्या सेवा जनतेस तात्काळ उपलब्ध होतील. महा-ई-सेवा केंद्रातुन देण्यात येणारे ७/१२ Non editable database व्दारे देण्यात आल्यामुळे, संबंधित तालुक्याच्या कुठल्याही तलाठी यांनी database update झालेल्या दिवसाची तारीख टाकुन त्या तालुक्याच्या कुठल्याही गावाचा ७/१२ सही करण्याचा अधिकार राहील.

६. विभागीय आयुक्तालयातील उप आयुक्त (महसुल), प्रत्येक जिल्हाधिकारी कार्यालयातील निवासी उप- जिल्हाधिकारी, प्रत्येक तालुक्यातील तहसिलदार हे ई-गव्हर्नन्सच्या / महा-ई- सेवा केंद्र कामासाठी नोडल अधिकारी म्हणुन घोषित करण्यात येत आहेत. जिल्हाधिकारी आणि नोडल अधिकारी यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील ई-गव्हर्नन्स / महा-ई-सेवा केंद्र कामकाज व अंमलबजावणीबाबत दरमहा निश्चित केलेल्या दिवशी बैठक घ्यावी. विभागीय आयुक्त यांच्याकडे दरमहा होणाऱ्या जिल्हाधिकाऱ्यांच्या बैठकीमध्ये ई-गव्हर्नन्स / महा-ई-सेवा केंद्र योजनेची अंमलबजावणी व याव्दारे देण्यात येणाऱ्या शासकीय सेवा यांचा आढावा घेण्यात यावा.

या शासन निर्णयाची प्रत महाराष्ट्र शासन www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०१२०११५१६१८६२०००१ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. अजय भूषण पांडेय )
**प्रधान सचिव (मा तं)**

**प्रत माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी,**
राज्यपाल यांचे सचिव,

मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद / नगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमख व कार्यालय प्रमुख,
यशदा महासंचालक
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती ( २ प्रती)